**श्री.सुनिल महाजन, यांचा धारणाधिकार असलेल्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा मधील सहाय्यक प्रशासन अधिकारी (गट-ब) पदावर पदस्थापना देणेबाबत ..**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२३/प्र.क्र.१६१/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीखः २५ ऑगस्ट, २०२३

**वाचा**

1) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही१०९२/ १०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दि.०२ डिसेंबर, १९९७**
2) **शासन आदेश क्रमांकः वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक ससेप्र ११२२/प्र.क्र.२९२/वैसेवा-१ दि.२१ डिसेंबर २०२२**
3) **शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२३/प्र.क्र.१६१/पापु-१५ दि.०१ जून, २०२३**

**प्रस्तावना**

श्री. सुनिल महाजन,तत्कालीन सहाय्यक प्रशासन अधिकारी (गट-ब) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी मुख्य प्रशासकीय अधिकारी (गट अ) महाराष्ट्र वैद्यकीय शिक्षण व संशोधन सेवा या पदाकरिता विहित मार्गाने अर्ज दाखल केला असल्यामुळे श्री. सुनिल महाजन यांनी केलेल्या विनंती नुसार त्यांना सामान्य प्रशासन विभाग ०२.१२.१९९७ मधील परिच्छेद २ (ब) (१) मधील तरतुदींच्या अधिन राहुन त्यांना महाराष्ट्र वैद्यकीय शिक्षण व संशोधन सेवा या संवर्गातील मुख्य प्रशासकीय अधिकारी (गट- अ) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सातारा या पदावर रुजू होण्यासाठी दिनांक १.०६.२०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये कार्यमुक्त करण्यात आलेले आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) मधील नियम १९८१ च्या नियम २२ मधील तरतुदीच्या अधीनतेने श्री. सुनिल महाजन यांचा त्यांचा मूळ पदावर म्हणजेच, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सहाय्यक प्रशासन अधिकारी (गट-ब) या पदावरचा धारणाधिकार कायम ठेवून कार्यमुक्त करण्यात आले आहे.

०२. श्री. सुनिल हिलाल महाजन यांनी त्यांच्या दिनांक ११.०७.२०२३ रोजीच्या विनंती अर्जान्वये त्यांच्या कौटुंबिक अडचणीमुळे त्यांच्या मूळ धारणाधिकार असलेल्या भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा मधील सहाय्यक प्रशासन विभाग (गट-ब) या पदावर परत रुजू करुन घेण्याची विनंती केली आहे श्री.सुनिल हिलाल महाजन यांना त्यांच्या मुळ धारणाधिकार असलेल्या सहाय्यक प्रशासन अधिकारी,

भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा (गट-ब) या पदावर परत रुजू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढील प्रमाणे शासन निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

श्री. सुनिल हिलाल महाजन, मुख्य प्रशासकीय अधिकारी, शासकीय वैद्यकीय शिक्षण व संशोधन सेवा(गट-अ) यांना त्यांच्या मूळ संवर्गातील भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणेमधील सहाय्यक प्रशासन अधिकारी (गट-ब) पदावर धारणाधिकार कायम असल्यामुळे त्यांच्या मूळ नियुक्ती/ पदोन्नती आदेशातील अटींच्या अधिन राहून रुजू करुन घेण्यात येत आहे. सुनिल हिलाल महाजन यांची सहाय्यक प्रशासन अधिकारी, प्रादेशिक उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, नाशिक या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे. सदर पदावर श्री.महाजन यांनी तात्काळ रुजू व्हावे.

२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे अधिकारी दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८२५११३८५८८८२८ असा आहे.हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.08.25 15:31:11 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
३. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे

५. आयुक्त,वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राव्दारे)
७. सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा
८. महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन ,मुंबई,
१०. जिल्हा कोषागार आधिकारी, सातारा/नाशिक.
११. श्री. सुनिल महाजन (ई-मेल व्दारे)
१२. निवडनस्ती